# ॐ श्रीमहादेव्यै नमः

# ॥ अथ श्रीदेव्यपराधक्षमापनस्तोत्रम् ॥

# (मराठी अभंगपदांसह)

| | |
|---|---|
| न मन्त्रं नो यन्त्रं तदपि च न जाने स्तुतिमहो<br>न चाह्वानं ध्यानं तदपि च न जाने स्तुतिकथाः ।<br>न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपनं<br>परं जाने मातस्त्वदनुसरणं क्लेशहरणम् ॥ १॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | देवी तुझे स्तोत्र / पूजा मंत्र तंत्र /<br>आवाहन ध्यान / ठाऊकी ना ।।१।।<br>पौराणिक कथा / त्याही न वाचील्या /<br>आळवणी मुद्रा / कैसे कांही ।।२।।<br>मात्र एक ठावे / त्वदनुसरण /<br>हरवील क्लेश / माझे सारे ।।३।। |
| विधेरज्ञानेन द्रविणविरहेणालसतया<br>विधेयाशक्यत्वात्तव चरणयोर्या च्युतिरभूत् ।<br>तदेतत् क्षन्तव्यं जननि सकलोद्धारिणि शिवे<br>कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ २॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | शास्त्र विधि मज / नाही ना माहीत /<br>धनविहीनता / आळसही ।।४।।<br>ऐशा कारणांनी / दूरच राहीलो /<br>चरणांपासून / मी गे माये ।।५।।<br>दुबळी कारणे / ऐसी मी शोधीली /<br>तरी क्षमा करी / मज माये ।।६।।<br>असतो कुपुत्र / कुमाता नसते /<br>शिवानी सर्वांना / उद्धरीते ।।७।। |
| पृथिव्यां पुत्रास्ते जननि बहवः सन्ति सरलाः<br>परं तेषां मध्ये विरलतरलोऽहं तव सुतः ।<br>मदीयोऽयं त्यागः समुचितमिदं नो तव शिवे<br>कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ३॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | जाणतो आहेत / सुपुत्र बहुत /<br>मी तरी विरळा / पुत्र तुझा ।।८।।<br>म्हणूनी कां माये / मला टाकायचे /<br>अव्हेरीते काय / माय पुत्रा ।।९।।<br>असतो कुपुत्र / कुमाता नसते /<br>शिवानी सर्वांना / उद्धरीते ।।१०।। |

| | |
|---|---|
| जगन्मातर्मातस्तव चरणसेवा न रचिता<br>न वा दत्तं देवि द्रविणमपि भूयस्तव मया ।<br>तथापि त्वं स्नेहं मयि निरुपमं यत्प्रकुरुषे<br>कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ४॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | जगदंबे तुझे / चरणांची सेवा /<br>नाही ना मी केली / अंमळही ।।११।।<br>इतुकेही नाही / धन मी अर्पिले /<br>तरीही तू माते / मजवरी ।।१२।।<br>अपरंपारशा / स्नेहाने मायेने /<br>मज जोजवीले // कबूल तें ।।१३।।<br>असतो कुपुत्र / कुमाता नसते /<br>शिवानी सर्वांना / उद्धरीते ।।१४।। |
| परित्यक्त्वा देवान् विविधविधसेवाकुलतया<br>मया पञ्चाशीतेरधिकमपनीते तु वयसि ।<br>इदानीं चेन्मातस्तव यदि कृपा नापि भविता<br>निरालम्बो लम्बोदरजननि कं यामि शरणम् ॥ ५॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | हें करूं तें करूं / ऐसेच करीत /<br>राहीलो देव ना / आठवले ।।१५।।<br>आणि आतां झाले / वय पंचाऐंशी /<br>दीन दुबळा मी / तुझे पायी ।।१६।।<br>फटकार माझा / तूही करशील /<br>जाऊं मी कोठे गे / विचारी गे ।।१७।। |
| श्वपाको जल्पाको भवति मधुपाकोपमगिरा<br>निरातङ्को रङ्को विहरति चिरं कोटिकनकैः ।<br>तवापर्णे कर्णे विशति मनु वर्णे फलमिदं<br>जनः को जानीते जननि जननीयं जपविधौ ॥ ६॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | तू जरी अपर्णा / तुझ्या स्तवनाच्या /<br>शब्दांनी घडती / चमत्कार ।।१८।।<br>चंडालांची वाणी / मधुर बनते /<br>दरिद्री होतात / कोट्याधीश ।।१९।।<br>पामरचि आम्ही / नाही ना जाणीतो /<br>तुझ्या नामध्याने / साध्य काय ।।२०।। |
| चिताभस्मालेपो गरलमशनं दिक्पटधरो<br>जटाधारी कण्ठे भुजगपतिहारी पशुपतिः ।<br>कपाली भूतेशो भजति जगदीशैकपदवीं<br>भवानि त्वत्पाणिग्रहणपरिपाटीफलमिदम् ॥ ७॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | दिगंबर शंभू / डोईवरी जटा /<br>चिताभस्म अंगी / लेपलेले ।।२१।।<br>विष प्राशूनीया / गळां सर्पमाळ /<br>ऐसा विचरतो / पशुपति ।।२२।।<br>कवट्यांचा हार / लेवीतो तरीही /<br>भूतेश मिरवे / जगदीश ।।२३।।<br>त्यालाच त्रिवार / तूंच वरलेस /<br>तुझ्याच प्रभावें / महेश तो ।।२४।। |

| | |
|---|---|
| न मोक्षस्याकाङ्क्षा भवविभववाञ्छापि च न मे<br>न विज्ञानापेक्षा शशिमुखि सुखेच्छापि न पुनः ।<br>अतस्त्वां संयाचे जननि जननं यातु मम वै<br>मृडानी रुद्राणी शिव शिव भवानीति जपतः ॥ ८॥<br>(यमनसभलग १७ शिखरिणी) | नको मज मोक्ष / नको वैभवही /<br>नकोच विशेष / ज्ञान सुद्‌धा ।।२५।।<br>नाहीच कसल्या / सुखाचीही आशा /<br>प्रार्थना आहे गे / इतुकीच ।।२६।।<br>केवळ जपत / तुझे गोड नांव /<br>जन्म हा व्यतीत / होऊं दे ना ।।२७।। |
| नाराधितासि विधिना विविधोपचारैः<br>किं रुक्षचिन्तनपरैर्न कृतं वचोभिः ।<br>श्यामे त्वमेव यदि किञ्चन मय्यनाथे<br>धत्से कृपामुचितमम्ब परं तवैव ॥ ९॥<br>(तभजजगग १४ वसंततिलका) | नाही विधियुक्त / उपचारयुक्त /<br>आराधना म्यां गे / कधी केली ।।२८।।<br>जाणतो नसावी / रुक्ष वटवट /<br>करावे पूजन / भक्तियुक्त ।।२९।।<br>ठावें असूनही / नाही ना घडत /<br>तूच माझी बुद्‌धि / योग्य करी ।।३०।। |
| आपत्सु मग्नः स्मरणं त्वदीयं<br>करोमि दुर्गे करुणार्णवे शिवे ।<br>नैतच्छठत्वं मम भावयेथाः<br>क्षुधातृषार्ता जननीं स्मरन्ति ॥ १०॥<br>(पादे पादे ११ अक्षराणि उपजाति) | संकटी पडतां / तुज आठवतो /<br>एरव्ही कां नाही / ध्यान होते ।।३१।।<br>नाठाळपणा हा / माझा जरी होतो /<br>भुकेजलें मूल / रडतें ना ।।३२।।<br>ऐसे जाणूनीया / मजवरी कृपा /<br>सदैव ठेवी गे / माते शिवे ।।३३।। |
| जगदम्ब विचित्रमत्र किं<br>परिपूर्णा करुणास्ति चेन्मयि ।<br>अपराधपरम्परापरं<br>न हि माता समुपेक्षते सुतम् ॥ ११॥<br>(१०-११-१०-११) | मजवरी कृपा / ऐसी ठेवण्याने /<br>जगावेगळेसे / नाही कांही ।।३४।।<br>मुलाने कितीही / अपराध केले /<br>माता मुलास ना / अव्हेरीते ।।३५।। |
| मत्समः पातकी नास्ति पापघ्नी त्वत्समा न हि ।<br>एवं ज्ञात्वा महादेवि यथायोग्यं तथा कुरु ॥ १२॥<br>(अनुष्टुप्) | मजसम पापी / नसेल कोणीही /<br>तुजसम नाही / पापहारी ।।३६।।<br>ऐसे जाणूनीया / माते महादेवि /<br>यथायोग्य जैसे / तैसे करी ।।३७।। |

| | |
|---|---|
| ॥ॐ तत्सदिति श्रीमच्छङ्कराचार्यविरचितं श्रीदेव्यपराधक्षमापनस्तोत्रं सम्पूर्णम् ॥ | सर्वापराधांची / देवीकडे क्षमा /<br>मागण्यास स्तोत्र / पावलें हें ।।३८।।<br>शंकराचार्यांनी / केलें ऐसे स्तोत्र /<br>सर्व पामरांना / जागवाया ।।३९।।<br>म्हणूं भक्तिभावें / महादेव्यै नमः /<br>श्रीजगज्जनन्यै / नमो नमः ॥४०॥ |



देवीनेच सेवा । अभंगपदांची । करून घेतली । ऐसे रीती ॥

तिचेच चरणी । चाळीशी अर्पण । विनीत श्रीपाद । अभ्यंकर ॥

**शुभमस्तु !**

**-o-O-o-**